**एम.आय.डी.सी. पोलीस स्टेशन, लातूर यथे गु.र.नं. ८०/२०१४ (कल्पना मंगल गिरी हत्या प्रकरण) मधून उद्भवणा-या सत्र न्यायालयातील सर्व प्रकरणाचे काम पाहण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड.श्री.उज्वल निकम यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी २०१४/प्र.क्र.१४८/पोल-१०**
गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मुंबई-४०० ०३२
दिनांक : २३ फेब्रुवारी, २०१७

<u>संदर्भ :</u> १. शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग क्र. एसपीपी २५१४/ए.एस.७१/डी-१४, दिनांक १२ ऑगस्ट, २०१४
२. शासन अधिसूचाना, विधि व न्याय विभाग क्र. एसपीपी-२५१४/ए.एस.७१/डी-१४, दिनांक ०३ ऑक्टोंबर, २०१६

**शासन निर्णय:**

एम.आय.डी.सी. पोलीस स्टेशन, लातूर यथे गु.र.नं. ८०/२०१४ (कल्पना मंगल गिरी हत्या प्रकरण) मधून उद्भवणा-या न्यायालयीन प्रकरणी सत्र न्यायालयातील सर्व प्रकरणाचे शासनाच्या वतीने कामकाज पहाण्यासाठी ॲड.श्री.उज्वल निकम यांची विधी व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक १२ ऑगस्ट, २०१४ च्या अधीसूचनेद्वारे विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आली होती. तथापि, सदरचा गुन्हा केंद्रीय अन्वेषण विभागाकडे (सीबीआय) वर्ग करण्यात आल्यामुळे, विधि व न्याय विभागाने संदर्भाधीन क्रमांक २ येथील दिनांक ०३.१०.२०१६ च्या अधिसुचनेन्वये सदरची नियुक्ती रद्द केलेली आहे. ही बाब विचारात घेता ॲड.श्री.उज्वल निकम यांना दि.१२.०८.२०१४ ते दिनांक ०३.१०.२०१६ या कालावधीकरीता खालीलप्रमाणे व्यवसायीक फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी | - | रू. ३०,०००/- |
| ब) विचारविनिमय फी (प्रतितास)<br>(कमाल मर्यादा प्रतिदिन रु.३०,०००/-) | - | रू. ८,०००/- |
| क) हॉटेल लॉजिंग बोर्डिंग (प्रतिदिन) | - | रु. ५,०००/- |

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिका-याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी. तसेच, प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्री.उज्वल निकम यांना, वरीलप्रमाणे फी दर, हे दि.१२.०८.२०१४ ते ०३.१०.२०१६ या कालावधीतील प्रस्तुत न्यायालयान

प्रकरणापुरतेच अनुज्ञेय राहतील. उपरोक्त नमुद फी व्यतिरिक्त अपरिणामकारक सुनावणी फी, अथवा इतर कोणतीही फी वा भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र.बी-१, २०५५ पोलीस - (००) १०९, जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८) - २८ व्यावसायिक सेवा या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३९/१७/व्यय-७, दिनांक ३१.०१.२०१७ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०३१६५०४८२४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun Vishnupant Joshi

Digitally signed by Arun Vishnupant Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=25b1cd893dfd4dc594def1c4642465ecdafbdae899f879d9b4603fe37cfb3598, cn=Arun Vishnupant Joshi
Date: 2017.03.03 16:51:34 +05'30'

(अ. वि. जोशी)
**कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस अधीक्षक, लातूर.
३. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई .
४. कोषागार अधिकारी, लातूर.
५. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
६. ॲड.श्री.उज्वल निकम, बॅरिस्टर निकम चौक, ४८, रामदास कॉलनी, जळगाव, जि. जळगाव.
७. विधी व न्याय विभाग (का १४), मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (पोल-१०).